सन २०१८-१९ या वित्तीय वर्षासाठी महाराष्ट्र राज्य समाजकल्याण बोर्डास निधी वितरीत करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## महिला व बाल विकास विभाग

## शासन निर्णय क्रमांक-सकबो-२०१८/प्र.क्र.५०/का-१०

नविन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख-०७ जून, २०१८.

**वाचा :-**

शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२ एप्रिल, २०१८.

**प्रस्तावना :-**

वित्त विभागाच्या उपरोक्त संदर्भाधीन परिपत्रकानुसार विधानमंडळाने “महाराष्ट्र विनियोजन विधेयक, २०१८” मंजूर केले आहे. सदर परिपत्रकानुसार सन २०१८-१९ च्या प्रथम नऊमाहीकरीता (डिसेंबर, २०१८ अखेर) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमावरील खर्चाचा अर्थसंकल्पीत निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ७० टक्केच्या मर्यादेत सदर प्रणालीद्वारे (बीम्स) वितरित केला जाईल, असे वित्त विभागाने कळविले आहे.

२. सन २०१८-१९ या वित्तीय वर्षासाठी २२३५ बी ९४२ या लेखाशिर्षाखाली ३६ सहायक अनुदन (वेतन) बाबीसाठी ₹४६,४६,०००/- (अक्षरी रुपये शेहेचाळीस लाख शेहेचाळीस हजार फक्त) व ३१ सहायक अनुदन (वेतनेत्तर) बाबीसाठी एकूण ₹५,५०,५३,०००/- (अक्षरी रुपये पाच कोटी पन्नास लाख त्रेपन्न हजार फक्त) इतकी तरतूद मंजूर आहे. २२३५ बी ९४२ या लेखाशिर्षाखाली वित्त विभागाच्या संदर्भाधीन परिपत्रकानुसार वेतन व वेतनेत्तर बाबींसाठी उपलब्ध निधी ७०% च्या मर्यादेत महाराष्ट्र राज्य समाजकल्याण बोर्डास वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

वित्त विभागाच्या संदर्भाधीन परिपत्रकानुसार सन २०१८-१९ या वित्तीय वर्षासाठी २२३५ बी ९४२ या लेखाशिर्षाखाली ३६ सहायक अनुदन (वेतन) या बाबीसाठी उपलब्ध अर्थसंकल्पीय तरतूद ₹४६,४६,०००/- (अक्षरी रुपये शेहेचाळीस लाख शेहेचाळीस हजार फक्त) च्या ७०% च्या मर्यादेत **₹३२,५२,२००/- (अक्षरी रुपये बत्तीस लाख बावन्न हजार दोनशे फक्त)** व ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या बाबीसाठी उपलब्ध अर्थसंकल्पीय तरतूद ₹५,५०,५३,०००/- (अक्षरी रुपये पाच कोटी पन्नास लाख त्रेपन्न हजार फक्त) च्या ७०% मर्यादेत **₹३,८५,३७,१००/- (अक्षरी रुपये तीन कोटी पंच्याऐंशी लाख सदतीस हजार शंभर फक्त)** इतका निधी महाराष्ट्र राज्य समाजकल्याण बोर्डास वितरित करण्यास शासन याव्दारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी महाराष्ट्र राज्य समाजकल्याण बोर्डास वितरित करण्यासाठी जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. आहरण व संवितरण अधिकारी यांनी हा निधी महाराष्ट्र राज्य समाजकल्याण बोर्डास वितरीत करावा. तथापि, सदरचा निधी कोषागारातून एकदम आहरित न करता महाराष्ट्र राज्य समाजकल्याण बोर्डाची खर्चाची / निधीची आवश्यकता तपासून जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर (आहरण व संवितरण अधिकारी) यांनी खर्चाचे देयक कोषागारात सादर करावे. जेणेकरुन विनाकरण निधी समाजकल्याण बोर्डाकडे शिल्लक राहणार नाही, याची दक्षता घ्यावी. तसेच याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्याची दक्षता सचिव, महाराष्ट्र राज्य समाजकल्याण बोर्ड व आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांनी घ्यावी.

४. सदर रक्कम मागणी क्र.एक्स-१, अनिवार्य, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२ समाजकल्याण १०२, बाल कल्याण (०२) (०४) महाराष्ट्र राज्य समाजकल्याण मंडळाला सहायक अनुदान (२२३५ बी ९४२ ) ३६ सहायक अनुदाने (वेतने) व ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ मध्ये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या तरतूदीतून खर्च करण्यात यावी.

५. वित्त विभागाच्या दि.०२ एप्रिल, २०१८ रोजीच्या परिपत्रकानुसार सदर परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील नमूद तपासणी सूचीतील अटींची तसेच परिच्छेद-७ मधील अटींची पुर्तता होत असल्याने विभागाच्या स्तरावर सदर निधी वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

६. हा शासन निर्णय वित्त विभाग परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२ एप्रिल, २०१८ अन्वये त्या विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०६०७१७०१२१७२३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Smita Dattatray Nivatkar

Digitally signed by Smita Dattatray Nivatkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3fa46cf1e928518ffc98619187a1ef6de2dd57c16934e9cb6672cc02aa258b08, cn=Smita Dattatray Nivatkar
Date: 2018.06.07 17:03:34 +05'30'

( स्मिता निवतकर )
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. सचिव, महाराष्ट्र राज्य समाजकल्याण बोर्ड, चेंबूर, मुंबई-७१
३. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई / नागपूर

४. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर

५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई

७. जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर

८. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई

९. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

१०. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सदर निधी बी.डी.एस. प्रणालीवर वितरीत करण्याच्या विनंतीसह अग्रेषित.

११. निवड नस्ती, का-१०.